Convertion in Regular Temparary Establishment :- Shri Anandrao Ramchandra Khobragade, Worker working under S.E. & Administrator, CADA,Nagpur.

अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांच्या अधिपत्याखालील श्री आनंदराव रामचंद्र खोब्रागडे, मजूर यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक एसयुटी २००४/(१२०/२००४)/आ(कामगार)
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २४.०५.२०११

पहावे :-१) अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांचे पत्र क्रमांक ७७२०/लाविप्रा/आली १/२००९, दिनांक ३०.१२.२००९.

२) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दिनांक २४.४.२००१.

**प्रस्तावना :-**

श्री आनंदराव रामचंद्र खोब्रागडे यांची पाटबंधारे उपविभाग तुमसर येथे हंगामी मजूर म्हणून रोजंदारीवर दिनांक ११.०७.८० रोजी नियुक्ती करण्यात आली होती. त्यांना कामाच्या उपलब्धते नुसार काम देण्यात येत होते. कामाची उपलब्धता नसल्याने त्यांना दिनांक ३०.०६.८६ नंतर काम देणे बंद केल्याने त्यांनी समेट तथा कामगार अधिकारी, तुमसर यांच्याकडे तक्रार दाखल केली. तथापि तक्रारीवर समेट घडून न आल्याने श्री. खोब्रागडे यांनी मा.कामगार न्यायालय,भंडारा येथे दावा क्र.४४/८७ दाखल केला. श्री. खोब्रागडे हे पाटबंधारे विभाग अंतर्गत रोहयोच्या कामावर हंगामी कामगार होते. कामगारास कमी करताना औद्योगिक वाद विवाद अधिनियम १९४७ मधील कलम २५फ/२५ग यांचा अवलंब होणे आवश्यक होते मात्र अवलंब न झाल्याने कामगारास सेवा सलगतेसह कामावर पुनःस्थापित करुन,त्यास कामावरुन कमी करण्या पूर्वी तो घेत असलेल्या वेतनाच्या ५० टक्के इतकी थकबाकी अदा करण्याबाबत मा.कामगार न्यायालय,भंडारा यांनी दिनांक २९.१२.९० च्या निर्णयान्वये आदेश दिले. सदर कामगार न्यायालयाच्या निर्णयाविरुध्द शासनाच्या वतीने मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे रिट पिटीशन क्र.१५८६/९१ दाखल करण्यात आला असता मा. उच्च न्यायालयाने सदर रिट पिटीशन क्र.१५८६/९१ दिनांक १३.११.२००३ च्या निर्णयान्वये खारिज केले. त्यानंतर विधी व न्याय विभागाच्या अभिप्रायानुसार शासनाच्या वतीने मा.उच्च न्यायालय,नागपूर येथे एल.पी.ए.क्र.४९०८/२००५ दाखल करण्यात आले. दरम्यान श्री. खोब्रागडे यांनी त्यांना कामावर न घेतल्यामुळे मा.उच्च न्यायालय,नागपूर खंडपीठ येथे अवमान याचिका क्र.९२/०४ दाखल केली होती. यास्तव न्यायालयाचा अवमान होवू नये म्हणून सचिव समितीच्या मान्यतेने प्रलंबित एल.पी.ए च्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून श्री.खोब्रागडे यांना दि.१०.११.०४ च्या शासनपत्रान्वये दिनांक १३.१.२००५ पासून कामावर रुजू करुन घेण्यात आले. सदर एल.पी.ए.क्र.४९०८/२००५ दि.०३.०२.२००६ रोजी खारीज झालेला आहे.

श्री आनंदराव रामचंद्र खोब्रागडे यांना न्यायनिर्णयानुसार सचिव समितीच्या मान्यतेने

सेवासातत्यासह मजूर पदी पुनःस्थापित करण्यात आले आहे. कालेलकर करारानुसार सलग ५ वर्षाच्या सेवेनंतर त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा ११.७.१९८५ हा दिनांक ३१.१२.९८ पूर्वीचा आहे. यामुळे श्री खोब्रागडे शासन निर्णय, सा.बां.वि.,दि.२४.४.२००१ च्या परि.१(१) व परि.२ मधील अटीची पूर्तता करतात. सद्यःस्थितीत त्यांचे संबंधात कोणतेही प्रकरण न्याय प्रविष्ट नाही. त्यामुळे श्री.खोब्रागडे यांना पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांच्या अधिपत्याखालील श्री. आनंदराव रामचंद्र खोब्रागडे, यांचे मजूर हे पद अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यास खालीलप्रमाणे शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | कर्मचा-यांचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रु.अ.आ.वर आणवयाचा दिनांक | रु.अ.आ. वर घ्यावयाचे पद | वेतानश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री.आनंदराव रामचंद्र खोब्रागड | रोजंदारी | मजूर ११.०७.१९८० | ११.०७.१९८५ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५५०-३२००(५ वा वेतन आयोग) |

२. श्री आनंदराव रामचंद्र खोब्रागडे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवरील पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

३. अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांनी या आदेशातील सर्व बाबी विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत,याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याचे आत निर्गमित करुन ते संबंधित कर्मचा-यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव, पदनाम, त्यांचा प्रथम नियुक्तीचा दिनांक व त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिका-यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत. तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तीशः निदर्शनास आणावेत. शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत

संबंधित कर्मचा-यांची (नांव,पदनाम,त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापोवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब" मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र(Undertaking) घेवून ते त्या कर्मचा-यांच्या सेवापटात/सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपाल अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल,याबाबत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत/त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचा-यांच्या नेमणूकांच्या आदेशांच्या प्रती,नाममात्र हजेरी पटाच्या प्रती,आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

४. श्री आनंदराव रामचंद्र खोब्रागडे यांना न्यायालयाच्या निर्णयानुसार मजूर पदी रोजंदारी आस्थापनेवर सेवासातत्यासह पुनःस्थापित करण्यात आले आहे. तसेच श्री.खोब्रागडे यांनी दि.११.०७.१९८५ पासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्यास वाढीव वेतन व भत्त्याच्या थकबाकी पैकी दि.११.०७.१९८५ ते दि.३०.०६.१९९१ पर्यतची थकबाकी स्वेच्छेने सोडण्यास तयार असल्याचे प्रतिज्ञापत्र दिले आहे. त्यामुळे त्यांना अनुज्ञेय थकबाकीतून सदर कालावधीतील थकबाकी कपात करावी. त्यांना दि.०१.०७.१९९१ पासून प्रत्यक्ष कामावर घेतल्याच्या दिनांक १२.०१.२००५ पर्यतची न्यायनिर्णयानुसार ५० टक्के थकबाकी अनुज्ञेय राहील आणि दि.१३.०१.२००५ पासून आजपर्यतची पूर्ण थकबाकी त्यांना देय राहील. वरील प्रमाणे श्री. खोब्रागडे यांना देय असलेल्या थकबाकीचा पहिला हप्ता सन २०११-२०१२ मध्ये देण्यात यावा. तसेच थकबाकीची सर्व रक्कम सन २०१२-२०१३ या आर्थिक वर्षापासून त्या त्या वर्षाच्या जून महिन्यात संबंधीत कर्मचा-याच्या भविष्य निर्वाह निधीत एकूण१०(दहा) समान हप्त्यात जमा करावी. तथापि, त्यांच्या वेतनाची परिगणना त्यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

५. श्री आनंदराव रामचंद्र खोब्रागडे यांना दि.१३.०१.२००५ पासून या आदेशाच्या दिनांकापर्यतच्या वेतनाच्या फरकाची रक्कम रोखीने दयावयाची असून ती धनादेशाव्दारे (Cheque) अदा करावी.

६. या प्रस्तावावरील खर्च सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक रुअआ १५९६ / २२८ / सेवा-५, दिनांक २४ एप्रिल २००१ अवये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

८. हा शासन निर्णय www.maharashtra.gov.in हया संकेत स्थळावर २०११०५२४१५१२४५००१ हया संकेत क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्र :- **प्रपत्र- ब**

( अ.अ.कोदे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
महालेखापाल,लेखा परिक्षा ,महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
वित्त विभाग(व्यय १२), मंत्रालय,मुंबई
अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग(राज्य),भंडारा
आस्थापना(कामगार)संग्रहार्थ.